**सिंधुदुर्ग व रायगड येथील जी.एन.एम. नर्सिंग नर्सिंग स्कुलकरीता नवनिर्मित (प्रत्येकी २६ पदे) एकूण ५२ अस्थाई पदांना मुदतवाढ देण्याबाबत**

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः अपदे-२०१५/ प्र.क्र.४६/आरोग्य-४

मंत्रालय, १० वा मजला, कॉम्पलेक्स बिल्डींग,
गोकूळदास तेजपाल रूग्णालय आवार, मुंबई.
तारीख: २६ मे, २०१५.

**वाचा**

१) **शा. नि.,सा.आ.वि., क्रमांकः डीएचसी-३०१०/प्र.क्र.१८८/आरोग्य-३, दि.२.०२.२०१३.**
२) **शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांकः पदनि-२०१५/ प्र.क्र.५/१५/वित्तिय सुधारणा,दि.२०.०२.२०१५.**
३) **शा. नि.,सा.आ.वि., क्रमांकः अपदे-२०१४/प्र.क्र.१९१/आरोग्य-४, दि.२६.०८.२०१४.**
४) **उपसंचालक, आरोग्य सेवा ( शुश्रुषा ), मुंबई यांचे पत्र क्रमांकः संआसे/शुश्रुषा/कक्ष.९/टे-१/सिंधुदूर्ग/रायगड/अपदे-५२/सन२०१५-१६/५५८-५६०/१५,दि.२७.०१.२०१५.**

**प्रस्तावना**

राज्यातील सिंधुदुर्ग व रायगड येथील जीएनएम नर्सिंग स्कुलसाठी (प्रत्येकी २६ पदे) अशा एकूण ५२ अस्थाई पदांची संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये निर्मिती करण्यात आली आहे. सदर जीएनएम नर्सिंग स्कुलसाठीच्या (प्रत्येकी २६ पदे) अशा सोबतच्या विवरणपत्रातील एकूण ५२ अस्थाई पदांना दिनांक १.०३.२०१५ ते दिनांक २९.०२.२०१६ या कालावधीची मुदतवाढ देण्याचा प्रस्ताव आरोग्य सेवा संचालनालयाने शासनास सादर केला आहे. प्रस्तावात नमूद केलेल्या पदांचा अद्याप विभागाच्या आकृतीबंधात समावेश झालेला नाही. या एकूण ५२ अस्थाई पदांना दि.१.०३.२०१५ ते दि.२९.०२.२०१६ या कालावधीपर्यंत मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

राज्यातील सिंधुदुर्ग व रायगड येथील जीएनएम नर्सिंग स्कुलच्या (प्रत्येकी २६ पदे) सोबतच्या विवरणपत्रातील एकूण ५२ अस्थाई पदांना सदर पदांबाबत यापुढील मुदतवाढीचा प्रस्ताव सादर करतांना पदांच्या आढाव्याच्या संबंधी पुर्तता करण्यात याव्यात अटीच्या अधिन राहून दि.१.०३.२०१५ ते दि.२९.०२.२०१६ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

या पदांवरील खर्च सन २०१५-१६ या आर्थीक वर्षाच्या मागणी क्रमांक-१ मधील मुख्य लेखाशीर्ष " २२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०६-पंचवार्षीक योजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना, (०६) (०१)-मुफसल क्षेत्रातील अध्यापनेतर शासकीय रूग्णालये व दवाखाने (२२१० ०२२६) " व " २२११-कुटूंब कल्याण ,००३-प्रशिक्षण, (०१)-कुटूंब कल्याण प्रशिक्षण -१०० टक्के केंद्र पुरस्कृत योजना, (०१) (०२)-सहायक

परिचारिका प्रसविका, दाई व आरोग्य प्रचारक या निमवैद्यकीय कर्मचा-यांचे प्रशिक्षण ( २२११ ०१११ ) " करीता मंजुर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय,क्र.असंक-१००४/ प्र.क्र.१२( भाग-२ )( २००४)/ वित्तिय सुधारणा-१, दि.४.१०.२००४ व क्रमांक पदनि-२०१५/प्र.क्र.५/१५/ वित्तिय सुधारणा-१, दि.२०.०२.२०१५ अन्वये प्रशासकीय विभागप्रमुखांना प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५१२१६३६३०३३१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ramchandra Shankar Jadhav

Digitally signed by Ramchandra Shankar Jadhav
DN: CN = Ramchandra Shankar Jadhav, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.05.26 15:16:54 +05'30'

**रा. शं. जाधव**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई
२. अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा (कु.क., मा.बा.सं. व शा.आ.), पुणे
३. उपसंचालक, आरोग्य सेवा ( शुश्रुषा ), मुंबई.
४. उपसंचालक, आरोग्य सेवा ( कोल्हापूर / ठाणे मंडळ ).
५. महालेखापाल, १/२,महाराष्ट्र ( लेखा व लेखा परिक्षा ) (लेखा व अनुज्ञेयता ), मुंबई/ नागपूर.
६. जिल्हा शल्य चिकित्सक, सिंधुदुर्ग, रायगड.
७. प्राचार्य, जीएनएम नर्सिंग स्कुल- सिंधुदुर्ग, रायगड यांना संबंधित उपसंचालक, आरोग्य सेवा, यांचे मार्फत.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, सिंधुदुर्ग, रायगड.
९. वित्त विभाग (व्यय-१३, बीयुडी-८, वित्तिय सुधारणा ), मंत्रालय, मुंबई.
१०. नियोजन विभाग,( कार्यासन-१४५६ ), मंत्रालय, मुंबई.
११. कक्ष अधिकारी ( सेवा-५ / अर्थसंकल्प ), सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई.
१२. निवडनस्ती ( आरोग्य- ४ ).

सिंधुदूर्ग व रायगड येथील जी.एन.एम. नर्सिंग स्कुल ( प्रत्येकी २६ पदे )

| अ.क्र. | पदनाम | संवर्ग | वेतनश्रेणी | पदनिर्मितीचा शासन निर्णय | पदांची संख्या |
|---|---|---|---|---|---|
| १ | प्राचार्य | वर्ग-३ | ९३००-३४८०० (४४००) | शासन निर्णय,सा.आ.वि. क्र.डीएचसी-३०१०/ प्र.क्र.१८८/ आरोग्य-३, दिनांक २.०२.२०११. | १ |
| २ | उपप्राचार्य | वर्ग-३ | ९३००-३४८०० (४४००) | | १ |
| ३ | पाठ्यनिर्देशक | वर्ग-३ | ९३००-३४८०० (४४००) | | १४ |
| ४ | लघुटंकलेखक | वर्ग-३ | ५२००-२०२०० (२४००) | | १ |
| ५ | कनिष्ठ लिपिक | वर्ग-३ | ५२००-२०२०० (२४००) | | १ |
| ६ | ग्रंथपाल | वर्ग-३ | ५२००-२०२०० (२८००) | | १ |
| ७ | प्रयोगशाळा सहाय्यक | वर्ग-३ | ५२००-२०२०० (२०००) | | १ |
| ८ | वॉर्डन | वर्ग-३ | ५२००-२०२०० (२८००) | | ३ |
| ९ | शिपाई | वर्ग-४ | ४४४०-७४४० (१३००) | | ३ |
| **एकूण पदे** | | | | | **२६** |